सामाजिक न्याय विभागाच्या योजनांचा प्रचार व प्रसिध्दी खाजगी एफ.एम.रेडिओ व दूरचित्रवाहिन्यांवर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रसिध्दी २०१४/प्र.क्र.१६(१)/विघयो,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ मे,२०१५.

वाचा :- आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.सकआ/अजाउयो/प्रसिध्दी/ सन २०१४-१५/का-१४/१०१, दि.०७.०२.२०१५ .

**प्रस्तावना :**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या योजना हया मुख्यत: मागासवर्गीय लोकांसाठी राबविण्यात येतात. या योजनांच्या माहिती अभावी अनेक पात्र लाभार्थी या योजनांच्या लाभापासून वंचित राहतात. सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजनांची माहिती शहरी व ग्रामीण भागातील जनतेपर्यंत पोहचविण्याच्या उद्देशाने या योजनांना प्रसिध्दी देण्यासाठी विविध प्रसार माध्यमांचा वापर करण्यात येतो. विभागाच्या विविध योजनांची माहिती तळागाळातील लोकांपर्यंत पोहचविण्यासाठी एफ.एम.रेडिओ मिर्ची,रेडिओ सिटी व विविध दूरचित्रवाहिन्या हे प्रभावी माध्यम आहे. या माध्यमांव्दारे सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजनांची माहिती सर्वदूर ग्रामीण व शहरी जनतेपर्यंत पोहोचवून त्या योजनांचा लाभ त्यांना मिळणे सहज शक्य होईल.या अनुषंगाने सामाजिक न्याय विभागाच्या अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणा-या विविध योजनांचा प्रचार व प्रसिध्दी खाजगी एफ.एम.चॅनेलवर व विविध दूरचित्रवाहिन्यांवर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येणा-या योजनांचा प्रचार व प्रसिध्दी पुढील माध्यमांव्दारे करण्याकरीता मे.अॅश्युअर्ड अॅडव्हरटायझिंग अॅण्ड मिडीया प्रा.लि.,मुंबई या संस्थेस एकूण रु.४,९९,६८,२००/- (अक्षरी रुपये चार कोटी नव्यान्नव लक्ष अडुसष्ट हजार दोनशे फक्त) इतक्या मर्यादेत काम देण्यास पुढील अटी व शर्तीस अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रसिध्दी माध्यम | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १ | मे.अॅश्युअर्ड अॅडव्हरटायझिंग अॅण्ड मिडिया प्रा.लि.मुंबई | रेडिओ मिर्ची | १,९४,३२,८०० |
| | | रेडिओ सिटी | १,१५,८६,२४० |
| | | रेड एफ एम | ६७,९६,८०० |
| | | खाजगी वाहिनी (स्टार प्रवाह) | ५५,१०,७०० |
| | | खाजगी वाहिनी (मी मराठी) | ३,४९,६५० |
| | | खाजगी वाहिनी (आयबीएन लोकमत) | ७,९५,३३० |
| | | १२.३६ व्हॅट | ५४,९६,६८० |
| | | एकूण रक्कम | ४,९९,६८,२०० |

१) जाहिरातीचे दर हे जाहिरात, दृश्य व प्रसार संचालनालयाने (DAVP) निश्चित केलेल्या दराप्रमाणे राहतील.
२) सदरहू जाहिरातीच्या दरकराराची मुदत बाकी आहे याची खात्री करावी.
३) अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणा-या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासाच्या योजनांच्या जाहिरातींची निवड आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी आपल्या स्तरावर करावी व त्याबाबतची तपशिलवार माहिती मे.अॅश्युअर्ड अॅडव्हरटायझिंग अॅण्ड मिडिया प्रा.लि.मुंबई यांना द्यावी.
४) सदर जाहिरातींचे प्रसारण प्रत्यक्षात होते किंवा कसे याची खात्री करुन तसे प्रमाणित करावे.
५) सदर जाहिरातीचे प्रसारण कोणत्या तारखेपासून सुरु झाले व कोणत्या तारखेपर्यंत आहे तसेच कालावधी (slot) याची नोंद प्रमाणित करुन घेण्यात यावी.
६) ज्या जाहिरातींच्या प्रसारणासाठी रक्कम अदा करावयाची आहे ते पूर्ण झाले असल्याबाबत सर्व संबंधित एफ.एम.रेडिओ व दूरचित्रवाहिन्या यांच्याकडून खात्री करुन घेण्याची सर्वस्वी जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहिल.
७) उपरोक्त नमूद सर्व अटींची पुर्तता होऊन जाहिरातीचा २ महिन्याचा कलावधी पूर्ण झाल्यानंतर सदरच्या प्रसारणाचे देयक संबंधीत कंपनीस अदा करण्यात यावे.
८) आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी आवश्यक अटी व शर्तीसहीत (नियमीत अटी व शर्तीसह) मे.अॅश्युअर्ड अॅडव्हरटायझिंग अॅण्ड मिडिया प्रा.लि.मुंबई यांच्यासोबत करारनामा करुन घ्यावा.

२. उपरोक्त नमुद एफ.एम.रेडिओ व दूरचित्रवाहिनीवर ६० दिवसांचा कालावधी निश्चित करण्यात येत आहे.

३. याकरिता आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यावर होणारा खर्च मागणी क्र.एन-३,२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण,०१,१०२ आर्थिक विकास (०३)(०५), अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या योजनांना समाजकल्याण संचालनालयामार्फत व्यापक प्रसिध्दी देणे(विघयो) (२२२५ ३७२५), जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर दर्शविण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०५०७१५१७५७७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.18 15:35:02 +05'30'

**(दि.रा.डिंगळे)**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य
६) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
७) आयुक्त,समाजकल्याण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (६० दिवसांच्या कालावधीच्या विवरणपत्रासहित)
८) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½,मुंबई/नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
१०) मे.अॅश्युअर्ड अॅडव्हरटायझिंग अॅण्ड मिडिया प्रा.लि.मुंबई
११) कक्ष अधिकारी,(अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) निवडनस्ती,विघयो.

Publicity of the scheme implemented by social justice department through FM Radio and TV Channels.